भूमिगत स्वातंत्र्य सैनिकांच्या प्रकरणी
वयोमर्यादा निश्चित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-पीओअेस-१०९२/प्र. क्र. १०१/स्वासैकक्ष,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक-५ सप्टेंबर, १९९२.

वाचा :- [१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीओएस-१२८३/ भूस्वासै/विक-१/स्वासै, दिनांक३. १२. ८३.

[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीओएस-१२८६/ भूस्वासै/स्वासैकक्ष, दिनांक ७. ८. ८६.

[३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीओएस-१०९२/ प्र. क्र. १०१/९२/स्वासैकक्ष, दिनांक ७. ८. ९२.

शासन निर्णय :- भूमिगत स्वातंत्र्य सैनिकांना राज्य शासनाचे स्वातंत्र्य सैनिक सन्मान पेन्शन देण्यासाठी त्यांच्या अर्जाची छाननी करताना निकष ठरविण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीच्या सल्ल्याने खालीलप्रमाणे निकष ठरविण्यात येत आहेत :-

१] भूमिगत स्वातंत्र्य सैनिक म्हणून राज्य शासनाचे पेन्शन मिळण्यासाठी करावयाच्या अर्जावर जिल्हा गौरव समितीने शिफारस केलेली असली पाहिजे.

२] अर्जदाराचे वय कमीतकमी १६-वर्षे असावे.

३] संबंधित जिल्ह्यातील अर्जदाराला चळवळीच्या काळापासून ओळखणाऱ्या २ पेन्शनधारक स्वातंत्र्य सैनिकांची शिफारसपत्रे अर्जासोबत असावीत.

वरील निकष दिनांक १३. ५. ८९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या निर्णयाप्रमाणे दिनांक १३. ५. ८९ रोजी शासनाकडे प्रलंबित असलेल्या दिनांक ३०. ४. ८४ पूर्वीच्या व त्यानंतरच्या अर्जांच्या बाबतीत लागू आहेत. याशिवाय इतरही आवश्यक बाबींची अर्जदाराने पूर्तता करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ चं. रा. चव्हाण ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
मा. अध्यक्ष, मा. सभापती, मा. सदस्य सचिव, व इतर सदस्य, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय, मुंबई,
उपाध्यक्ष/कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,
उप महाव्यवस्थापक [वाहतूक], महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,